**रस्ता सुरक्षा अभियान राबविण्यासाठी निधी देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक टिआरए १२१०/प्र.क्र.५३४/पोल-८**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ९ मार्च, २०११.**

## शासन निर्णय

वाचा :- अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. अपोमसं (वा.)/४३/अनुदान/ ११/ २६०, दिनांक ४.२.२०११

**प्रस्तावना :** राज्यातील राज्य व राष्ट्रीय महामार्गांवर दरवर्षी मोठ्या प्रमाणात अपघात होत असून त्यामध्ये वर्षभरात साधारणतः १२००० इतके लोक मृत पावतात. त्यामुळे वाहन चालक/नागरीक यांचे प्रबोधन करुन वाहन अपघात कमी करण्यासाठी दिनांक १ जानेवारी, २०११ ते १५ जानेवारी, २०११ या कालावधीत संपूर्ण राज्यभर रस्ता सुरक्षा अभियान राबविण्यात आले आहे. त्यासाठी झालेल्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** वरील बाबींचा सर्वांगिण विचार करुन शासन याद्वारे दिनांक १ जानेवारी, २०११ ते दिनांक १५ जानेवारी, २०११ या कालावधीत संपूर्ण राज्यात रस्ता सुरक्षा अभियान राबविण्यासाठी आलेल्या रु. २३,८०,०००/- (रुपये तेवीस लाख ऐंशी हजार फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. या संदर्भात होणारा खर्च "२०५५-पोलीस- (००) ००१ संचालन व प्रशासन (००) (०१) पोलीस निरिक्षणालय (२०५५ ००१ ४) ५०- इतर खर्च " या उप लेखाशिर्षाखाली प्रथमतः शासन ज्ञापन वित्त विभाग क्र. आकनि-११.११/५८/अर्थसंकल्प-११, दि. ८.३.२०११ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या रु. २३,८०,०००/- (रु. तेवीस लाख ऐंशी हजार फक्त) एवढया आकस्मिकता निधी अग्रीमातून भागविण्यात यावा.

३. यासंबंधीचे देयके कोषागारात सादर करताना त्यावर लाल शाईने सदर खर्च आकस्मिकता निधीतून करण्यात आला आहे. अशी नोंद घेण्यात यावी व सदर प्रकरणी पूरक मागणीद्वारे अनुदान प्राप्त झाल्यावर तो मागणी क्र. बी-१, "२०५५-पोलीस- (००) ००१ संचालन व प्रशासन (००) (०१) पोलीस निरिक्षणालय (२०५५ ००१ ४) ५० इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली अंतिमतः खर्ची टाकण्यात यावा.

४. उपरोक्त नमूद केलेल्या अटींनुसार अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी जिल्हा/आयुक्तालय निहाय रक्कम वितरीत केल्यानंतर संबंधितांना आकस्मिकता निधी अग्रीम रकमेतून खर्च करण्यासाठी देयके सादर करण्यासंदर्भात पूढील सूचनां काटेकोरपणे पाळण्याबाबत कळवावे.

(एक) आकस्मिकता निधीतून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे रक्कम सूपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात आगाऊ रक्कमेतून खर्च करताना सादर करण्यात येणा-या देयकावर, "आकस्मिकता निधी अग्रीम, शासन ज्ञापन, वित्त विभाग क्र. आकनि-११.११/५८/अर्थसंकल्प-११, दिनांक ८.३.२०११, संगणक सांकेतांक (८००० ५७०४) अन्वयें मंजूर" असे लाल शाईने लिहावे अशी सूचना आदेशात अंतर्भूत करावी व ही सूचना लाल शाईने अधोरेखित करावी.

(दोन) आकस्मिकता निधी अग्रीम रकमेतून खर्च करण्यासाठी वेगळी देयके सादर करावीत.

(तीन ) देयकावर जोडलेल्या संगणक चिठ्ठीवर अर्थसंकल्प शीर्षाचा कोड नंबर लिहीण्यात यावा.

(चार) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक सीएनाएफ-१०८३/१४०/अर्थसंकल्प-३, दिनांक २६ एप्रिल, १९८३ व ज्ञापन परिपत्रक वित्त विभाग क्र. सीएनाएफ १०८६/१५३/अर्थसंकल्प-३, दि.२८ ऑगस्ट, १९८६ अन्वये आकस्मिकता निधीमधील आगाऊ रकमेबाबत दिलेल्या आदेशांचे काटेकोरपणे पालन करावे.

(पाच) आकस्मिकता निधी अग्रीमातून करावयाच्या खर्चासंबंधी देयके काढताना संगणक संकेताचा वापर करावा.

५. अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य तसेच सर्व संबंधित यांनी वरील मंजूरीप्रमाणे आकस्मिकता निधीतून अग्रीम रक्कम खर्च करतांना ज्या कारणासाठी तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे त्या कारणासाठी पूर्णपणे खर्च करावी. ते याकरिता पूर्ण जबाबदार राहतील. तसेच सदरहू अग्रीमातून प्रत्यक्ष खर्च केल्याची माहिती त्यांनी शासनास दिनांक १.४.२०११ पूर्वी अवगत करावी.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७/व्यय-७, दिनांक ४.१.२०११ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( शहाजहान मुलाणी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन. गृह विभाग**

प्रत,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त
सर्व पोलीस अधीक्षक
महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई,
(प्रत्येकी पाच जादा प्रतीसह)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), नागपूर,
(प्रत्येकी पाच जादा प्रतीसह)
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई, (दोन जादा प्रतीसह)
सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई-३२. (दोन जादा प्रतीसह)
अधिदान लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-११/व्यय-७,
गृह विभाग (बीयुडी-१),
निवड नस्ती (पोल-८)
निवड नस्ती (आस्था-३)